**पोलीस उप निरीक्षक पदी निवड झालेल्या**
**उमेदवारांच्या प्रशिक्षणास मुदतवाढ देण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : पीएसबी-०३१०/प्र.क्र.६२६/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ८ ऑक्टोबर २०१०

**: शासन परिपत्रक :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत पोलीस उपनिरीक्षक (महिला व पुरुष बिनहत्यारी) यांचे ५०% पदे सरळसेवा (नामनिर्देशनाने) भरतीने भरण्यात येत असून, या पदी नियुक्तीसाठी शिफारस झालेल्या उमेदवारांना महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे १२ महिन्यांच्या प्रशिक्षणासाठी पाठविण्यात येते. काही उमेदवार विविध कारणांमुळे प्रशिक्षणासाठी मुदतवाढ देण्याबाबत शासन, पोलीस महासंचालक यांच्याकडे विनंती अर्ज पाठवित असतात. प्रशिक्षणास मुदतवाढ देण्यासाठी प्राप्त अर्जांवर निर्णय घेण्यासाठी कोणतीही मार्गदर्शक तत्त्वे नसल्याने अशा अर्जांवर निर्णय घेताना अडचणी निर्माण होतात. हे लक्षात घेऊन प्रशिक्षणास मुदतवाढ देण्याबाबत मार्गदर्शक तत्त्वे ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. विविध यंत्रणांकडे पाठविण्यात आलेल्या मुदतवाढीच्या विनंती अर्जांवर एकत्रित कार्यवाही करण्याच्या दृष्टीने एकसुत्रता असावी म्हणून खालीप्रमाणे मार्गदर्शक तत्त्वे ठरविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

(अ) पोलीस उपनिरीक्षक मुख्य परीक्षा २००७ मध्ये निवड झालेल्या व त्यापुढे पोलीस उपनिरीक्षक (पुरुष व महिला) मुख्य परीक्षेतून निवड होणाऱ्या उमेदवारांना प्रशिक्षणास पाठविण्याच्या आदेशात असे स्पष्ट नमूद करण्यात यावे की, उमेदवारांना प्रशिक्षणाच्या मुदतवाढी संदर्भात विनंती अर्ज करावयाचे झाल्यास ते केवळ संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्याकडेच पाठविण्यात यावेत. शासनाकडे अथवा पोलीस महासंचालकांकडे प्राप्त झालेले मुदतवाढीचे अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

(ब) उमेदवारांच्या प्रशिक्षणासाठीच्या आदेशात असेही नमूद करण्यात यावे की, केवळ खालील तीन कारणांमुळे प्रशिक्षणास मुदतवाढ देण्याबाबत विचार करण्यात येईल. इतर कारणांसाठी मुदतवाढ दिली जाणार नाही.

(१) स्त्री उमेदवारांच्या बाबतीत त्या गरोदर असल्यास व तसे वैद्यकिय प्रमाणपत्र त्यांनी सादर केल्यास मुदतवाढीबाबत विचार करण्यात येईल.

(२) उमेदवार स्वतः आजारी असल्याबाबत व त्यास किमान एक महिना रुग्णालयात आंतररुग्ण म्हणून रहावे लागत असल्याचे "जिल्हा शल्य चिकित्सक" यांनी प्रमाणित केलेल्या प्रमाणपत्रासह उमेदवारांनी अर्ज केल्यास मुदतवाढीबाबत विचार करण्यात येईल.

(३) उमेदवार महाराष्ट्र लोकसेवा आयोग किंवा केंद्रीय लोकसेवा आयोगाची पूर्व परीक्षा उत्तीर्ण झाला असेल तर तशा आशयाच्या पुराव्यासह प्रशिक्षणास मुदतवाढीसाठी अर्ज केल्यास, मुदतवाढ देण्याबाबत विचार करण्यात येईल.

२ वरील कारणास्तव प्रशिक्षणासाठी मुदतवाढ देण्याबाबतचे निर्णय संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या स्तरावर घेण्यात येतील व सदर निर्णय अंतिम राहिल. प्रशिक्षण मुदतवाढीच्या अर्जावरील निर्णय, असा अर्ज प्राप्त झाल्यापासून दहा दिवसाच्या आत संबंधित उमेदवारांस संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक कळवतील.

३. वरील तीन कारणांव्यतिरिक्त अन्य कोणत्याही कारणास्तव आलेल्या विनंत्या नाकारल्यास, त्याबाबत पोलीस महासंचालक, शासन अथवा मंत्री महोदयांकडे केलेले अपील विचारात घेण्यात येणार नाही.

४ सदर परिपत्रक पोलीस महासंचालक यांचे कार्यालयाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार

**( सदानंद जाधव )**
**शासनाचे उपसचिव, गृह विभाग.**

प्रत.

(१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(३) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
(४) सर्व विभागीय पोलीस आयुक्त.
(५) सर्व पोलीस अधिक्षक.
(६) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
(७) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई.
(८) निवड नस्ती / पोल-५अ